**पौड, ता. मुळशी, जि. पुणे येथे लिंक कोर्टऐवजी दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग या न्यायालयाची स्थापन करणे व त्याअनुषंगाने पदे मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: न्यास्थाप-०१२५/प्र.क्र.१०/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ मार्च, २०२५.

वाचा :-१. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W)A-१२०७ of २०१७/७/३७२,दि.०३.०१.२०२५
२. जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे यांचे पत्र क्र.O.No.Gen /९०१४/२०२४,दि.२३.१२.२०२४
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क.दि.२७.४.२०२२.
४. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. एचसीटी-१२२२/८३८/प्र.क्र.१४३/कार्या.३,दि.६.२.२०२४.
५. शासन शुध्दीपत्रक,विधि व न्याय विभाग क्र.एचसीटी-१२२२/८३८/प्र.क्र.१४३/कार्या.३,दि.१०.१०.२०२४.

**प्रस्तावना:-**

मा. उच्च न्यायालयाच्या दि. ४/४/२००७ च्या मानक प्रारुपानुसार (Standard Format) राज्यात विविध ठिकाणी नवीन न्यायालय सुरु करण्यासाठी प्रलंबित खटले / प्रकरणांची संख्या किमान ५०० असावी, तसेच पायाभूत सुविधा उदा. न्यायालयीन इमारत आणि न्यायाधीशांची निवासस्थाने यांची उपलब्धता असावी. मा. उच्च न्यायालयाच्या धोरणानुसार आवश्यक सर्व निकष पूर्ण होत असल्याने पौड, ता. मुळशी, जि. पुणे येथे लिंक कोर्टऐवजी दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग या न्यायालयाची स्थापना करण्यास मा. उच्च न्यायालयाच्या "नवीन न्यायालय स्थापना समितीने" मान्यता दिली आहे. त्यानुसार पौड, ता. मुळशी, जि. पुणे येथे लिंक कोर्टऐवजी पूर्णवेळ दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग या न्यायालयाची स्थापना करण्याची व संदर्भ क्रमांक ४ व ५ अन्वये मंजूर केलेल्या पदांमधून सदर न्यायालयासाठी पदे उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पौड, ता. मुळशी, जि. पुणे येथे लिंक कोर्टऐवजी पूर्णवेळ दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग या न्यायालयाची स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठी संदर्भ क्र. ४ व ५ येथील शासन निर्णय व शुध्दीपत्रकान्वये मंजूर करण्यात आलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांच्या २८६३ नियमित पदांमधून तसेच ११०६४ सहाय्यभूत कर्मचारीवृदांच्या नियमित पदांमधून खालील तक्यात दर्शविण्यात आलेली नियमित पदे घेण्यास व ५८०३ मनुष्यबळांच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेण्यास, संबंधित न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून मान्यता देण्यात येत आहे.

नियमित पदे

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | मागणी केलेल्या पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथमवर्ग | जे-३ १११०००-१६३०३० | १ |
| २ | सहायक अधीक्षक | एस-१५-४१८००-१३२३०० | १ |
| ३ | लघुलेखक ग्रेड-३ | एस-१४-३८६००-१२२८०० | १ |
| ४ | वरिष्ठ लिपिक | एस-८: २५५००-८११०० | २ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | एस-६: १९९००-६३२०० | ४ |
| ६ | बेलिफ | एस-६: १९९००-६३२०० | ३ |
| | | एकूण | १२ |

बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या मनुष्यबळांच्या सेवा

| अ.क्र | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | शिपाई | २ |
| २ | पहारेकरी | १ |
| ३ | सफाईगार | १ |
| एकूण | | ४ |

बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना, वित्त विभागाच्या दि.२७/४/२०२२ च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता संबंधित न्यायालयाने घ्यावी.

२. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दि.३०/०९/२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दि. ३०/०९/२०२५ नंतर मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान,१०५ , जिल्हा व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२) (दत्तमत) (अनिवार्य)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या अनुषंगाने निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र. २०७/व्यय ५,दि. १३/०२/२०२५ अन्वये तसेच दि.२५/०२/२०२५ रोजीच्या मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०३१७४२१४६३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VILAS VASANTRAO GAIKWAD
Date: 2025.03.03 17:45:57 +05'30'

**(विलास वसंत गायकवाड)**
**विधि सल्लागार- नि- सह सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उपमुख्यमंत्री , (वित्त व नियोजन) महाराष्ट्र शासन यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

४ मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद.

५. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.

६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

८. मा. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

९. प्रबंधक (निरीक्षणे- १) , मा.उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे.

११. दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर व न्यायदंडाधिकारी प्रथमवर्ग, पौड, ता. मुळशी, जिल्हा पुणे.

१२. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. पुणे

१४. उप कोषागार अधिकारी, पौड, जि.पुणे

१५. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-५ / आ.पु.क., मंत्रालय, मुंबई.

१६. कार्यासन-३,१३,२०,२३ व २४, विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई.

१७. निवडनस्ती.